# बालभारती

## मराठी पुस्तक पहिले





१९६८

पुनर्मुद्रण
१९८१

शिक्षणखात्याचा मंजुरीचा क्रमांक : पपम–१०० (मभा) (१)–ह : दि २० मे १९६८

# बालभारती



## मराठी पुस्तक पहिले








१९७१

महाराष्ट्र राज्य पाठ्य-पुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ
पुणे

## प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार चांगल्या पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी, या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षणसंस्था यांनी पाठविलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरविण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षरपद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

पुणे :
दि. : २८ एप्रिल, १९६८
वैशाख ९, १८९०

संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती
व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

प्रथमावृत्ती : १९६८
पुनर्मुद्रण : १९७०, १९७१

उषा प्रिंटर्स, तुलक रोड, कुलाबा, मुंबई १ ( भारत ) येथे छापले.

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्‌ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडील-धाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करतो. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्‌धी ह्यातच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका





# १. कमळ बघ

कमळ बघ.
आई, कमळ बघ.

आई बघ कमळ



आ ई क घ ब म ळ

# २. कमळ आण

बबन, कमळ बघ.
छगन, कमळ बघ.
जगन, कमळ आण.

बबन छगन जगन आण



ग छ ज ण न



# ३. बदक

कमल, बदक बघ.
गणपत, बदक बघ.
जगन, पळ. बदक पकड.

कमल बदक गणपत पळ पकड



ड त द प ल



# ४. गाय

सरल, गाय बघ.

भरत, गाय बघ.

अमर, गवत आण.

छगन, गवत घाल.

गवत आणा. गवत घाला.

अमर भरत सरल गवत

गाय घाल घाला आणा



अ भ य र व स



# ५. हरण

हरण बघा हरण. छान छान हरण.
उमर, चल. हरण धर. शरद, गवत आण.
हरणाला गवत घाल.

उमर चल धर शरद हरण
छान बघा हरणाला



उ च ध श ह



## ६. बाळ

बाळ बघा. बाळाचा पाळणा बघा.
आई, दाखव ना मला बाळ.
हात मऊ. पाय मऊ.
नाक लहान. कान लहान.
इवलासा बाळ. छान छान बाळ.
चल चल बाळा.
पायात वाळा.

इवलासा कान छान दाखव नाक पाय
पाळणा पायात बाळ मऊ मला वाळा

इ ऊ ख

# ७. उजळणी




- भाऊ आई बाबा ताई दादा काका इवला
- बाळ गाय पाय कान धार रान चारा पाज घाल
- घर नळ घागर भर उचल आण बाग

# ८. वाफा

शरद, झटकन् ऊठ.

दशरथ, हसन, उठा.

ही जागा साफ करा.

ही जागा खणा.

मग वाफा तयार करा.

शरद, खत घाल.

दशरथ, बी टाक.

हसन, झारी आण.

पाणी आणा. पाणी घाला.





ऊठ खत झटकन् दशरथ हसन

उठा करा जागा टाक साफ वाफा तयार

झारी ही

झ ट ठ थ फ

# ९. मनीमाऊ



मनीमाऊ, मनीमाऊ,
नेहमीच तुला हवा खाऊ.
बसता उठता गुरूगुरू,
मियाव मियाव सदा सुरू.
गुपचुप गुपचुप घरात येशी.
दही दूध खाऊन जाशी.
टिपूला पाहून पळून जाशी.
अशी ग कशी तू वाघाची मावशी ?



उठता गुपचुप गुरूगुरू सुरू

खाऊ माऊ तू दूध टिपूला पाहून पळून





# १०. भाजीचा मळा

एकनाथ, हा आमचा मळा.
ही आमची नवी विहीर.

हा माझा दादा.

ही माझी वहिनी.

बाबा आणि दादा काम करतात.

ऐन दुपारींही काम करतात.

आई आणि वहिनी भाजी काढतात–

पडवळ, पालक, गाजर, काकडी,

चुका, चाकवत, चवळी, मिरची.

बाबा बाजारात भाजी विकतात.

आमचा मळा हिरवागार.

भाजी आमची ताजी फार.

    

एकनाथ ऐन नवी काकडी चवळी भाजी मळा

आमची माझी मिरची वहिनी विहीर हिरवागार

चुका दुपारी आणि विकतात

ए ऐ ढ



# ११. साफ साफ

हात दाखव. पाय दाखव.
हातपाय धू. हातपाय पूस.
दात घास. दात धू.
नख बघू. कान बघू.
नख काढ. कान पूस.
हात साफ. पाय साफ.
अंग धू. अंग पूस.
धुऊन पुसून साफ साफ.
साफ झाले नाककान.
सारे कसे छान छान.

बघू  धू  पूस  धुऊन  पुसून  कसे  झाले  सारे








अं



# १२. टेकडीवरील देऊळ

ती पाहा टेकडी.
टेकडीजवळ ओढा आहे.
टेकडीवर एक देऊळ आहे.
देऊळ रामाचे आहे. देऊळ छान आहे.
देवळाला जायला वाट आहे.
वाट वाकडीतिकडी आहे.
सकाळची वेळ, छान गार हवा.
रामाला जाऊन पान-फूल वाहा.

एक आहे रामाचे टेकडीवर देवळाला वेळ ओढा

**ओ**

# १३. उजळणी




- टेकडी इथे झाडी झरा ओढा देऊळ मुले इकडे फराळ डबा झुणका भाकर भात दही लाडू पोळी भाजी चटणी लोणचे
- दिवाळी पणती भाऊबीज भाऊ बहीण टोपी पाट ताट ओवाळणी खण रुपया
- मी नाव हात पाय डोळे कान नाक पोषाख ऐट पाहणे धावणे वडील शाळा गुरुजी

# १४. पोपट



पोपटा, पोपटा,
बोलतोस गोड,
पण झालास रोड.
खा ना जरा पेरूची फोड.

भाऊ, भाऊ,
बोलतोस गोड,
देतोस फोड,
दार उघड आणि मला सोड.

भाऊ, भाऊ,
रानात जाईन,
फळे खाईन,
डहाळीवर बसून झोके घेईन.

—सौ. सरला देवधर

| | | | |
|---|---|---|---|
| गोड | झोके | देतोस | पोपट |
| फोड | बोलतोस | रोड | सोड |
| उघड | जाईन | पेरूची | बसून |



# १५. भैरूचे औत

पहाट झाली. भैरू उठला.
बैल सोडले. औत घेतले.
शेतात जाऊन औत धरले.

दुपार झाली. औत सोडले.
बैलांना वैरण घातली.
बैलांना पाणी पाजले.

जवळच एक झाड होते.
बैल झाडाखाली बसले.
भैरूने भाकरी काढली–
झुणका, भाकरी, कैरीचे लोणचे.
भैरू झाडाखाली बसला. आवडीने जेवला.

भैरूने परत औत धरले.
दिवस मावळला. औत सोडले.
औत घेऊन तो घरी गेला.

कैरीचे बैल भैरू वैरण लोणचे
शेतात उठला जाऊन





# १६. अंगतपंगत

चंपाने आणली कांदा-भाकर.
गंगूने आणली दही-साखर.
चटणी, लोणचे कुंदाचे.
भात, पिठले शंकरचे.
वरण, तूप पांडूचे.
केळी, आंबे सुभाषचे.
झाडाखाली पंगत बसली.
अंगतपंगत छान जमली.

अंगतपंगत गंगूने चंपाने शंकरचे आंबे

कांदा कुंदाचे सुभाषचे वरण तूप

ष

# १७. आमचे घर

हे पाहा आमचे घर.
आमचे घर कौलारू आहे.
हे अंगण, हा ओटा.
ही बाबांची बैठक.
हे सैपाकघर.
ही झोपायची खोली.
मधे हा चौक आहे.
चौकात हौद आहे. हौद खूप मोठा आहे.



पलीकडे गोठा आहे.
हे आमचे बैल.
हा हैबती, हा दौलती.
हैबती, दौलती औत ओढतात.
कधी गाडी ओढतात.
कधी मोटही ओढतात.
हे समोर मोठे मैदान आहे.
चला, मैदानावर जाऊ.
विटीदांडू खेळू. लंगडी खेळू.
हसू, खेळू, मौज करू.





अंगण विटीदांडू लंगडी
बैठक बैल मैदानावर सैपाकघर हैबती
ओटा ओढतात
औत कौलारू चौक दौलती मौज हौद




अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः ऋ

क ख ग घ ङ च छ ज झ ञ

ट ठ ड ढ ण त थ द ध न

प फ ब भ म य र ल व

श ष स ह ळ क्ष ज्ञ

अक्षर पक्षी यज्ञ ज्ञानदेव ऋषी ऋतू

अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः

ा ि ी ु ू े ै ो ौ ं ः

क का कि की कु कू के कै को कौ कं कः

- लेखन उषा कागद दौत शाई लेखणी अक्षर सुरेख वळणदार दादा मामा पाकीट तिकीट पेटी चिकटवणे लिहिणे
- पतंग कागद रंगीत कामटी शेपटी दोरा मांजा रीळ मैदान तयार उडवणे उंच आकाश घार ढील ओढ करणे
- गाव शाळा बाजार पाटील गुरुजी दुकाने तलाठी नदी पाणवठा विहीर मळ शेते पार वड चिंच निंब खाऊ
- शाळा ओटा मैदान खोली फळा बाक टेबल केरसुणी टोपली कचरा केर साफसफाई



# १९. पेरूची फोड

“पेरू घ्या पेरू, तीस पैशांना तीन पेरू.
ताजे ताजे पेरू. गोड गोड पेरू.”

माधव : आई, पेरू घेतेस ? चांगले ताजे दिसतात.

आई : हाक मार पेरूवाल्याला. तीस पैसे दे.
तीन चांगले पेरू निवडून घे.
सुधा, उषा, या. माधव, पेरू आण.
मी चिरून देते.

माधव : पेरू किती छान आहे !

सुधा : पेरू किती गोड आहे !

आई : उषा, तू खा ना ग पेरू.

उषा : पण आई, तुला ग पेरू ?

आई : तिघांना तीन पेरू दिले. मला नको.

उषा : आई, माझ्या दोन फोडी तू घे.

सुधा : माझ्याही दोन फोडी घे.

माधव : माझ्या पण दोन फोडी घे.

आई : वा ! माझ्याजवळ तर खूप फोडी झाल्या.
ही घ्या आणखी एकेक फोड.

माधव : माझा पेरू किती गोड लागला !

सुधा : माझा तर फारच गोड होता !

उषा : पण मी सांगू ? आईची फोड फारच गोड !
पेरूची फोड लागली गोड.
आईची फोड तर फारच गोड !

घ् + य = घ्य घ्या

झ् + य = झ्य माझ्या

ल् + य = ल्य पेरूवाल्याला



## २०. गावाची फुलबाग

ही आमच्या गावाची फुलबाग आहे.
बागेत फुलझाडे आणि वेली आहेत.
झाडांवर, वेलींवर खूप फुले आहेत—
जाईची आणि जुईची,
चमेलीची आणि गुलाबाची,
पारिजातकाची आणि चाफ्याची.
इकडे फुले, तिकडे फुले,
सगळीकडे फुलेच फुले.
लाल, केशरी, पिवळी, पांढरी,
रंगीबेरंगी, सुरेख आणि वासाची,
नाजूक, सुंदर, फुलेच फुले!
बागेत वारा सहज शिरतो.
सुवास फुलांचा घेऊन जातो.





इकडे जातो, तिकडे जातो.
गावात सुवास पसरून देतो.
आमच्या गावात येऊन जा.
सुवास फुलांचा घेऊन जा.

च् + य = च्य    आमच्या    फ् + य = फ्य    चाफ्याची



## २१. सूर्योदय (चित्रवाचन)

सूर्योदय सूर्य डोंगर नदी शेते शेतकरी झाडे अनेक पक्षी.

र् + य = र्य सूर्य

# २२. देव

देवा तुझे किती सुंदर आकाश
सुंदर प्रकाश सूर्य देतो.

सुंदर चांदण्या चंद्र हा सुंदर
चांदणे सुंदर पडे त्याचे.

सुंदर ही झाडे सुंदर पाखरे
किती गोड बरे गाणे गाती.

सुंदर वेलींची सुंदर ही फुले
तशी आम्ही मुले देवा, तुझी.

—ग. ह. पाटील





| | | | |
|---|---|---|---|
| प् + र = प्र | प्रकाश | द् + र = द्र | चंद्र |
| ण् + य = ण्य | चांदण्या | म् + ह = म्ह | आम्ही |



## २३. खार

सर सर झाडावर
झर झर खाली.
घराच्या कौलांवर
कौलांवरून अंगणात.

ही पाहा खार.
काय तिची धावपळ !
किती तिची चपळाई !
तिच्याशी खेळा छापापाणी.
पाहा बरे, हाती लागते का ?

खारुताई, खारुताई, थांबलात का ?
वा ! आता जेवायला बसलात का ?
शेंगांचा फराळ आवडतो, नाही का ?
वा रे तुमची बैठक ! आणि शेपटीची ऐट !

कुरकुर कुरकुर खाता.
सुरसुर सुरसुर पळता.
चक्‌चक् चक्‌चक् बोलता.
टकमक टकमक बघता.

या की, आमच्याशी खेळायला.
धावायला नि पळायला.
तुमची आमची दोस्ती,
खूप करू मस्ती.

स् + त = स्त    दोस्ती, मस्ती.



# २४. मी कोण





चाक फिरवतो गरागर
मडकी करतो भराभर
मी कोण ?



लाकूड कापतो, लाकूड तासतो,
औत, गाडी करून देतो.
मी कोण ?



लाल लोखंड, खाली ऐर
वरून मारतो घण दणाद
मी कोण ?



सोने घेतो, चांदी घेतो,
दागदागिने करून देतो.
मी कोण ?



विटा घेतो, चुना घेतो,
घरे, विहिरी बांधून देतो.
मी कोण ?



सूत घेतो, मागावर घालतो,
लुगडी, धोतरे विणून देतो.
मी कोण ?



कोरे कापड घेऊन जातो,
सदरे, झबली शिवून देतो.
मी कोण ?



चामडे घेतो, खूप कमावतो,
जोडे, मोटा करून देतो.
मी कोण ?



शेत नांगरतो, पीक काढतो,
कष्ट करून खायला देतो.
मी कोण ?

१ + ८ = ९ कष्ट

# २५. झुक झुक झुक

गाडी आली गाडी आली–झुक् झुक् झुक्
शीट कशी वाजे बघा–कुक् कुक् कुक्

इंजिनाचा धूर निघे–भक् भक् भक्
चाके पाहू तपासून–ठक् ठक् ठक्

जायाचे का दूर कोठे–भूर भूर भूर
कोठेही जा नेऊ तेथे–दूर दूर दूर

गाडीमधे बसा चला–पट् पट् पट्
सामानही ठेवा सारे–चट् चट् चट्

तिकिटाचे पैसे काढा–छन् छन् छन्
गाडीची ही घंटा वाजे–घण् घण् घण्

नका बघू डोकावून–शुक् शुक् शुक्
गाडी आता निघालीच–झुक् झुक् झुक्.

–वि. म. कुलकर्णी





## २६. शूर शिपाई

मी शूर शिपाई आहे.
हा पाहा माझा पोशाख.
खाकी सदरा. खाकी विजार.
खाकी टोपी, काळा बूट.
मी ऐटीत चालतो,
खाड् खाड् खाड् !

मी शूर शिपाई आहे.
मी चोराला भीत नाही.
मी वाघाला भीत नाही.
ही पाहा माझी बंदूक.
मी बंदूक खांद्यावर ठेवतो.
मी ऐटीत चालतो.
खाड् खाड् खाड् !

आई, मी शूर शिपाई आहे.
मला पुष्कळ सोबती आहेत.
आम्ही कवाईत करतो.
मी सगळ्यांचा पुढारी होतो.
मी सगळ्यांना हुकूम सोडतो.
आम्ही लुटुपुटूची लढाई करतो.
आम्ही बंदूक उडवतो,
ठो, ठो, ठो!

आम्ही शूर शिपाई आहोत.
आम्ही चालताना गाणे म्हणतो,
"आम्ही सारे शूर शिपाई,
देशासाठी करू लढाई."

द् + य = द्य खांद्यावर ष् + क = ष्क पुष्कळ
ळ् + य = ळ्य सगळ्यांना





## २७. गांधीजी

हे आपले गांधीजी.
किती साधे दिसतात ते!
गांधीजी पहाटे लवकर उठत.
देवाची प्रार्थना करीत.
खूप खूप काम करीत.
दिवसभर त्यांचे काम चालूच असे.

गांधीजी झोपडीत राहात.
ते दररोज सूत कातीत.
स्वतः तयार केलेले कापड वापरीत.
ते नेहमी स्वच्छ राहात. नेहमी खरे बोलत.

गांधीजींना मुले फार आवडत.
ते मुलांचे बापू होते.
ते सर्वांचेच बापू होते.

वंदन करु या गांधीजींना
"गांधीजीकी जय" बोला.

| | | | |
|---|---|---|---|
| त् + य = त्य | त्यांचे | स् + व = स्व | स्वच्छ |
| प् + र = प्र | प्रार्थना | च् + छ = च्छ | स्वच्छ |
| र् + थ = र्थ | प्रार्थना | | |





## २८. आनंदाने नाचू या !

चला गड्यांनो खेळू या !
आनंदाने नाचू या ! ॥

बाग चिमुकली
फुले उमलली
सुंदर फुलली
फुलांसारखे होऊ या
फुलांभोवती नाचू या ॥

फुलांभोवती
भुंगे फिरती
गाणी गाती
तसेच आपण गाऊ या
ताल धरोनी नाचू या ॥

आभाळाचे
तऱ्हेतऱ्हेचे
रंग मजेचे
चला चला रे पाहू या
आनंदाने नाचू या ॥

—के. नारखेडे

र् + ह = ऱ्ह     तऱ्हेतऱ्हेचे





## २९. आमची आजी

आमची आजी आम्हांला फार आवडते. ती फार चांगली आहे!

दादा रागावला, की आम्ही जातो आजीकडे. ताईने मारले, की आजी आम्हांला जवळ घेते. आमचे डोळे पुसते. खडीसाखर देते. मग आम्ही हसू लागतो.

भूक लागली, की जावे आजीकडे. ती पोळीचा गोड गोड लाडू करून देते. आमची आजी आम्हांला फार आवडते.

माझ्या सदऱ्याला ती गुंड्या शिवून देते. यमूला परकर पोलके नेसवून देते. आजी सर्वांचे काम करते.

कोणी खेळायला नसले की आजीजवळ जातो. आजी गमतीच्या गोष्टी सांगते. आमची आजी आम्हांला फार आवडते.

झोप आली, की जाऊन झोपतो आजीजवळ. मग आजी गोड गोड गाणे म्हणते –

आंब्याची आंबराई । आल्या गेल्याला सावली ।
तुझ्या आजाने लावली । बाळराजा ॥

गाणे ऐकता ऐकता झोप लागते.

अशी आहे आमची आजी. किती मायाळू ! किती चांगली !

ड् + य = ड्य गुंड्या ब् + य = ब्य आंब्याची





# ३०. माझ्या या ओटीवर

.१.

माझ्या या ओटीवर
कोण कोण येते–कोण कोण येते ?
चिमणी येते नि कावळा येतो,
टपटप दाणे टिपून जातो–टिपून जातो.
होला येतो नि पारवा येतो,
हू हू घू घू करून जातो–करून जातो.
मैना येते नि पोपट येतो,
मंजूळ मंजूळ बोलून जातो–बोलून जातो.
मोर येतो नि लांडोर येते,
थय थय थुई थुई नाचून जाते–नाचून जाते.

.२.

माझ्या या हौदावर
कोण कोण येते–कोण कोण येते ?
चिमणी येते नि कावळा येतो,
बुडबुड गंगे न्हाऊन जातो–न्हाऊन जातो.
होला येतो नि पारवा येतो,
थेंबथेंब पाणी पिऊन जातो–पिऊन जातो.

मैना येते नि पोपट येतो,
पाणी उडवून खेळून जातो–खेळून जातो.
मोर येतो नि लांडोर येते,
थुई थुई थुई थुई नाचून जाते–नाचून जाते.

.३.

माझ्या या बागेत
कोण कोण येते–कोण कोण येते?
चिमणी येते नि कावळा येतो,
इकडे तिकडे उडून जातो–उडून जातो.
मैना येते नि पोपट येतो,
पेरू, डाळिंब खाऊन जातो–खाऊन जातो.
मोर येतो नि लांडोर येते,
आंब्याच्या डहाळीवर झुलून जाते–झुलून जाते.
कोकीळ येतो नि बुलबुल येतो,
गोड गोड गाणी गाऊन जातो–गाऊन जातो.

—श्रीमती ताराबाई मोडक

न् + ह = न्ह न्हाऊन



# ३१. लबाड कोल्हा

एक कोंबडीचे पिलू होते. ते झाडाखाली दाणे टिपीत होते. इतक्यात थोडा वारा आला. झाडाची पाने हालली. एक पान खाली पडले. ते पडले नेमके पिलाच्या पाठीवर. पिलाने वर पाहिले. त्याला वाटले, आभाळ पडले. ते घाबरून पळत सुटले.

पळता पळता त्याला भेटला एक ससा. त्याने विचारले, "अरे, असा पळतोस का?"

पिलू म्हणाले, "पळा, पळा! जीव वाचवा. आभाळ खाली पडत आहे. त्याचा एक तुकडा माझ्या पाठीवर पडला."

ससा घाबरला. तोही त्याच्याबरोबर पळू लागला.

ते दोघे पळत होते. समोरून एक बदक येत होते. त्याने विचारले, "सशा, सशा, काय झाले तुला? पळतोस का असा?" ससा काही थांबला नाही. तो म्हणाला, "बदकबुवा! पळा, पळा! थबकत थबकत चालू नका. वरून आभाळ पडत आहे."

बदक बिचारे घाबरले. त्यांच्याबरोबर पळू लागले. वाटेत एक लांडोर नाचत होती. बदक म्हणाले, "ए नाचणबाई, पुरे कर नाचणे. आभाळ खाली पडत आहे."

लांडोर पण घाबरली. तीही लागली पळायला. ते चौघेजण पळत होते. 'आभाळ पडले, आभाळ पडले,' असे सारखे ओरडत होते.

समोरून आला एक कोल्हा. त्याने हे ऐकले. तो होता लबाड. मनात म्हणाला, 'बरी सापडली शिकार'. तो समोर गेला आणि त्यांना म्हणाला, "घाबरू नका. चला सारे माझ्या घरात. माझे घर आहे जमिनीत. आभाळ पडले तरी ते राहील वरच." लांडोर, बदक, ससा व पिलू हे सर्व कोल्ह्याच्या बिळात आले. कोल्हा म्हणाला, "आता राहा इथंच. वर जाल तर आभाळ पडेल."

चौघांपैकी कोणीच कधी वर आले नाही!

ल् + ह = ल्ह कोल्हा क् + य = क्य इतक्यात

ल् + ह् + य = ह्य कोल्ह्याच्या





## ३२. बाहुली

या बाई या,
बघा बघा कशी माझी बसली बया !
ऐकू न येते,
हळूहळू अशी माझी छबी बोलते.
डोळे फिरविते,
टुलूटुलू कशी माझी सोनी बघते.
बघा बघा ते,
गुलूगुलू गालातच कशी हसते.
मला वाटते,
हिला बाई सारे काही सारे कळते !
सदा खेळते,
कधी हट्ट धरुन न मागे भलते.
शहाणी कशी !
साडी चोळी नवी ठेवी जशीच्या तशी.

— दत्त

ट् + ट = ट्ट  हट्ट



## ३३. वाघोबाची फजिती

(वाघ पिंजऱ्यात येरझारा घालीत आहे. समोरून मोळीवाला येतो.)

वाघ : मोळीवालेदादा, अहो मोळीवालेदादा. माझ्यावर दया करा. मला पिंजऱ्यातून सोडवा.

मोळीवाला : कोण ? पिंजऱ्यातला वाघ. वाघोबा, अहो तुम्ही कसे या पिंजऱ्यात अडकलात ?

वाघ : काय सांगू दादा. पारध्याच्या जाळ्यात सापडत होते हरिण. मला त्याची कीव आली. त्याला वाचवण्यासाठी मी झेप घेतली आणि मीच सापडलो जाळ्यात. पारध्याने मग मला पिंजऱ्यात कोंडून ठेवले.

मोळीवाला : असे ? बरे. मग, मी काय तुम्हांला पिंजऱ्यातून सोडवू म्हणता ?

वाघ : होय दादा. मी हरणावर दया केली, तशी तुम्ही माझ्यावर करा.

मोळीवाला : ते खरे. पण तुम्ही आहात वाघोबा. पिंजऱ्यातून सुटलात की आमचाच कराल चट्टामट्टा. नको रे बाबा !



वाघ : असे हो काय करता दादा! मी केलेल्या दयेचे हेच का फळ? माझ्यावर विश्वास ठेवा. मी तुमच्या पाया पडतो.

मोळीवाला : अरेरे! वाघोबा काय ही तुमची दशा! थांबा हं. हे पाहा, मी दार उघडले. चला. या आता बाहेर.

वाघ : (बाहेर येऊन) दादा, मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाही. चला ओढ्यावर. मला फार तहान लागली आहे. मी पाणी पितो. मग तुमची मोळी तुमच्या घरी पोचवतो.

मोळीवाला : हा पाहा ओढा. प्या वाघोबा पाणी. किती गोड आहे या ओढ्याचे पाणी!

वाघ : गोड तर खरेच. आता मला हुशारी आली. पण दादा, मला फार भूक लागली हो. येथे तर खायला काहीच नाही. तुम्हीच तेवढे आहात. मी तुम्हांलाच खातो. दुसरे काय करणार .

मोळीवाला : वाहवा रे वाहवा ! खासा न्याय ! मी तुमच्यावर उपकार केले त्याचे हे फळ होय ? ते काही नाही. याचा न्याय झालाच पाहिजे.

[२]

(समोरून लपतछपत एक कोल्हा जातो. त्याला पाहात...)

मोळीवाला : अहो कोल्होबा, जरा इकडे या.

कोल्हा : काय दादा ?

मोळीवाला : हे बघा, मी या वाघाला पिंजऱ्यातून सोडवले. आता हा म्हणतो की तुलाच खातो. तुम्हीच न्याय करा.

वाघ : होय कोल्होबा, तुम्हीच करा आमचा न्याय. माझे यात काय चुकले, हेच मला कळत नाही.

कोल्हा : पण तुम्ही पिंजऱ्यात कसे अडकलात, हे मला कळत नाही. चला आपण पिंजऱ्याजवळ जाऊ. तेथेच न्याय करू. चला.





वाघ : हा पाहा पिंजरा.

कोल्हा : एवढासा तर पिंजरा! त्यात तुम्ही कसे अडकलात? मला पिंजऱ्यात शिरून दाखवा पाहू.

वाघ : (पिंजऱ्यात शिरून) हे काय! असा शिरलो मी पिंजऱ्यात.

कोल्हा : ते ठीक झाले. पण पिंजऱ्याचे दार तर उघडेच आहे. ते तेव्हा बंद असेल, नाही का?

मोळीवाला : होय ना. तेव्हा दार बंदच होते.

कोल्हा : कसे? दादा, तुम्ही दार बंद करून दाखवा पाहू.

मोळीवाला : (दार बंद करीत) हे असे दार बंद होते. होय ना वाघोबा?

कोल्हा : दादा, आता काय विचारता त्याला? वाघोबा, बसा आता पिंजऱ्यातच आराम करीत! आम्ही जातो. झाला आमचा न्याय. चला दादा. बरे आहे वाघोबा. राम राम!

(वाघ रागाने डरकाळी फोडतो.)

| | | | |
|---|---|---|---|
| न् + म = न्म | जन्मभर | प् + य = प्य | प्या |
| ढ् + य = ढ्य | ओढ्यावर | न् + य = न्य | न्याय |

# ३४. गाणी

## चांदोमामा

चांदोमामा चांदोमामा हसतोस का ?
ढगामागे जाऊन लपतोस का ?
हळूच ढगामागून बघतोस का ?
लपाछपी छपाछपी खेळतोस का ?
चांदोमामा चांदोमामा रुसतोस का ?
एक दिवस दडी मारून बसतोस का ?
काळा काळा अंधार करतोस का ?
थकून भागून निजतोस का ?





## पाऊस

ये रे ये रे पावसा
तुला देऊ पैसा
पैसा झाला खोटा
पाऊस आला मोठा ॥ १ ॥

पाऊस पडला झिम् झिम् झिम्
अंगण झाले ओले चिंब
पाऊस पडला मुसळधार
रान झाले हिरवेगार ॥ २ ॥

ये ग ये ग सरी
माझे मडके भरी
सर आली धावून
मडके गेले वाहून ॥ ३ ॥



# दिन दिन दिवाळी

दिन दिन दिवाळी
गाई म्हशी ओवाळी.

गाई म्हशी कुणाच्या ?
लक्ष्मणाच्या.

लक्ष्मण कुणाचा ?
आईबापाचा.

दे माई खोबऱ्याची वाटी.
वाघाच्या पाठीत घालीन काठी.





## विठूचा गजर

विठूचा, गजर हरिनामाचा
झेंडा रोविला ॥ १ ॥

वाळवंटी, चंद्रभागेच्या काठी
डाव मांडिला ॥ २ ॥

विटीदांडू आणि लगोऱ्याचेंडू
डाव मांडिला ॥ ३ ॥

आट्यापाट्या आणि हुतूतू गोट्या
डाव मांडिला ॥ ४ ॥

# ३५. जोडाक्षरे

(१) क् + य = क्य इतक्यात
घ् + य = घ्य घ्या
च् + य = च्य आमच्या
झ् + य = झ्य माझ्या
ड् + य = ड्य गुंड्या
ढ् + य = ढ्य ओढ्यावर
त् + य = त्य त्याचे
द् + य = द्य खांद्यावर
द् + य = द्‌य खांद्‌यावर
न् + य = न्य न्याय
प् + य = प्य प्या
फ् + य = फ्य चाफ्याची
ब् + य = ब्य आंब्याची
र् + य = ऱ्य ताऱ्यांचा
ल् + य = ल्य पेरूवाल्याचा
ळ् + य = ळ्या सगळ्यांना
ळ् + य = ळ्‌य सगळ्‌यांना

(२) ट् + ट = ट्ट हट्ट
ट् + ट = ट्‌ट हट्‌ट
ठ् + ठ = ठ्ठ विठ्ठल
ठ् + ठ = ठ्‌ठ विठ्‌ठल
त् + त = त्त पत्ता
त् + त = त्‌त पत्‌ता
न् + न = न्न पन्नास
न् + न = न्‌न पन्‌नास
ल् + ल = ल्ल किल्ला
ल् + ल = ल्‌ल किल्‌ला

(३) त् + र = त्र रात्र
द् + र = द्र चंद्र
श + र = श्र श्रीधर
र् + य = र्य सूर्य
ऱ् + ह = ऱ्ह तऱ्हा

(४) न् + म = न्म जन्म
न् + ह = न्ह न्हाऊन
म् + ह = म्ह आम्ही
ल् + ह = ल्ह कोल्हा
ल् + ह्य = ल्ह्य कोल्ह्याचा
ल् + ह्य = ल्‌ह्य कोल्‌ह्याचा
स् + त = स्त दोस्ती
ष् + क = ष्क पुष्कळ
ष् + ट = ष्ट कष्ट
ष् + ट = ष्‌ट कष्‌ट
ष् + ट + र = ष्ट्र महाराष्ट्र
ष् + ट + र = ष्‌ट्र महाराष्‌ट्र

# वाचा पाहू

| | | |
|---|---|---|
| अक्का (अका) | आत्माराम | व्यायाम |
| कच्चा (कच्चा) | उत्सव | निश्चय (निश्चय) |
| सज्जन (सज्जन) | उद्धव (उद्धव) | प्रश्न (प्रश्न) |
| खड्डा (खड्डा) | पद्माकर (पद्माकर) | काश्मीर |
| अन्न (अन्न) | द्रविड | आश्विन (आश्विन) |
| प्रसन्न (प्रसन्न) | द्वारका (द्वारका) | श्याम |
| किल्ला (किल्ला) | विंध्य | श्लोक (श्लोक) |
| इयत्ता (इयत्ता) | ध्रुव | श्रीमंत |
| अण्णा | ध्वज | श्रीधर |
| अप्पा | स्वप्न | उष्ण |
| शाब्बास | शब्द (शब्द) | पुस्तक |
| झिम्मा | अभ्यास | अस्वल |
| लग्न (लग्न) | अभ्रक | स्नेही |
| आग्रा | शर्ट | भास्कर |
| शत्रुघ्न (शत्रुघ्न) | वर्णन | प्रार्थना |
| स्वच्छ | अर्धा | ब्राम्हण (ब्राह्मण) |
| वज्रेश्वरी (वज्रेश्वरी) | सर्प | लक्ष्मण |
| ज्वारी | बर्फ | अज्ञ |
| राष्ट्रगीत (राष्ट्रगीत) | वर्ष | अज्ञान |
| खड्ग | कल्पना | सुज्ञ |

# आपले राष्ट्रगीत

जनगण मन अधिनायक जय हे
भारत भाग्य विधाता।
पंजाब, सिंधु, गुजरात, मराठा,
द्राविड, उत्कल, बंगा,
विंध्य, हिमाचल, यमुना, गंगा,
उच्छल जलधि तरंगा,
तव शुभ नामे जागे
तव शुभ आशिष मांगे,
गाहे तव जय गाथा,
जनगण मंगलदायक जय हे,
भारत भाग्य विधाता।
जय हे। जय हे। जय हे।
जय जय जय जय हे।

